जलसंपदा विभागाच्या आस्थापनेवरील अभियांत्रिकी सेवेतील गट अ व ब मधील विद्युत व यांत्रिकी संवर्गातील पदनामांमध्ये (विद्युत व यांत्रिकी) ऐवजी (विद्युत) असा बदल करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा-२०२२/प्र.क्र.५३/आ( पुर्नरचना )**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग ,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : ०६ जून, २०२४.

**वाचा :-** १) जलसंपदा विभाग, शासन निर्णय, क्र.आढावा-१००२/(३३५/२००२)/आ(प्रशि), दि.०६.०२.२००३.
२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२६/१४/आस्था(संनि)), दि. ०१.०४.२०१४.
३) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, पत्र क्र.७३(ए)(५)१७७४/१६५२/२०२२/दहा, दि.०२.०८.२०२२.

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागातील महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट - अ व गट - ब मधील पदांच्या सेवाप्रवेश नियमांत कालानुरुप सुधारणा करण्यासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय, दि.०१.०४.२०१४ अन्वये पडताळणी समिती (Core Committee) गठीत करण्यात आली होती. सदर समितीने महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट - अ व ब मधील विद्युत व यांत्रिकी संवर्गातील पदांच्या कर्तव्य व जबाबदाऱ्यांमध्ये आता यांत्रिकी प्रकारच्या कामांचा अंतर्भाव होत नसल्याने सदरच्या पदनामांमध्ये "विद्युत व यांत्रिकी" ऐवजी केवळ "विद्युत" (उदा. मुख्य अभियंता (विद्युत व यांत्रिकी) ऐवजी मुख्य अभियंता (विद्युत) असा बदल करण्याबाबत शिफारस केली होती.

२. मुख्य अभियंता (विद्युत व यांत्रिकी) या पदाच्या सेवाप्रवेश नियमामध्ये “Degree in Electrical Engineering”या शैक्षणिक अर्हतेचा समावेश असल्यामुळे मुख्य अभियंता (विद्युत व यांत्रिकी) गट-अ (राजपत्रित) ऐवजी मुख्य अभियंता (विद्युत), गट-अ (राजपत्रित) असे पदनाम सुधारित करण्याच्या अटींच्या अधीन राहून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भ क्र.३ येथील दि. ०२.०८.२०२२ रोजीच्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. त्यानुसार मुख्य अभियंता (विद्युत व यांत्रिकी) या पदाप्रमाणेच "विद्युत व यांत्रिकी" संवर्गातील इतर पदांच्या पदनामात बदल करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

जलसंपदा विभागातर्गंत महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट-अ व ब मधील विद्युत व यांत्रिकी संवर्गातील खालील पदांच्या पदनामांमध्ये "विद्युत व यांत्रिकी" ऐवजी केवळ "विद्युत" असा बदल करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विद्युत व यांत्रिकी संवर्गातील सध्याचे पदनाम | नवीन पदनाम |
|---|---|---|
| १. | मुख्य अभियंता (विद्युत व यांत्रिकी) | मुख्य अभियंता (विद्युत) |
| २. | अधीक्षक अभियंता (विद्युत व यांत्रिकी) | अधीक्षक अभियंता (विद्युत) |
| ३. | कार्यकारी अभियंता (विद्युत व यांत्रिकी) (सहाय्यक मुख्य अभियंता) | कार्यकारी अभियंता (विद्युत) |
| ४. | उप अभियंता / उपकार्यकारी अभियंता (विद्युत व यांत्रिकी) | उप अभियंता (विद्युत) |
| ५. | सहायक अभियंता श्रेणी -२ (विद्युत व यांत्रिकी) | सहायक अभियंता श्रेणी -२ (विद्युत) |
| ६. | शाखा अभियंता (विद्युत व यांत्रिकी) | शाखा अभियंता (विद्युत) |
| ७. | कनिष्ठ अभियंता (विद्युत व यांत्रिकी) | कनिष्ठ अभियंता (विद्युत) |

**२.** उपरोक्त पदनाम बदलामुळे इतर संवर्गांशी तुलना करुन त्यांच्याप्रमाणे भविष्यात वेतन संरचनेची कोणतीही मागणी करता येणार नाही.

**३.** सदर पदनाम बदलाच्या अनुषंगाने विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांच्या सुधारित आकृतीबंधामध्ये आवश्यक सुधारणा करण्यात येत असून प्रत्येक संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमामध्ये सुधारणा करण्याची कार्यवाही संबंधित आस्थापना यांनी करावी.

**४.** सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. ६३७/का.१२, दि.१०.०८.२०२३ आणि वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. ६०७/आपुक, दि.२८.१२.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०६०६१७२५५६७३२७ हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAKHI SACHIN CHAVAN

Digitally signed by RAKHI SACHIN CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=7206b9312f3f73ff523e7a493d6d53d819f5c15336ff9a16ada11a287b879985, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=75AA5A95E2FE606BB64628D64D984EA9D651466BF93A6A2C44EEC93DF9207974, cn=RAKHI SACHIN CHAVAN
Date: 2024.06.06 17:39:03 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.उपमुख्यमंत्री ( जलसंपदा ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव ( जलसंपदा ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) सचिव ( लाक्षेवि ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव ( प्रकल्प समन्वय ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल१/२ ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
११) महालेखापाल१/२ ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, (मेरी) नाशिक
१४) सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ,जलसंपदा विभाग.
१५) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) सह सचिव (आस्था) /उप सचिव (सेवा)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) उप सचिव(सेवा) कार्यासन-१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) उप सचिव(आपुक), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) उप सचिव(सेवा-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) कक्ष अधिकारी (आ-संनि)/कक्ष अधिकारी(आ-तांत्रिक), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
(संबंधित पदांच्या सेवाप्रवेश नियमांत सुधारणा करण्यास्तव अग्रेषित)
२२) मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
२३) मुख्य अभियंता(विद्युत), जलसंपदा विभाग, मुंबई.
२४) सर्व मुख्य अभियंता/ अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२५) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(पदनामात झालेल्या बदलाची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
२६) कार्यासन आस्थापना ( पुनर्रचना ) निवडनस्ती.